**छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना - २०१७**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन शुध्दीपत्र क्रमांक: कृकमा ०६१७/प्र.क्र.१२७ /२-स,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० जुलै, २०१७.

**वाचा** :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०६१७/प्र.क्र.१२७ /२-स, दि.२८ जून, २०१७

२) शासन शुध्दीपत्र, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०६१७/प्र. क्र.१२७ /२-स, दि.५ जुलै, २०१७

**प्रस्तावना :-**

"वाचा" येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये "छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना-२०१७" जाहीर करण्यात आली असून राज्यातील शेतक-यांच्या कर्जमाफी योजनेबाबतचा तपशिल त्यात देण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयातील अटीनुसार प्रोत्साहनपर रकमेचा लाभ मिळविण्यासाठी सन २०१६-१७ या वर्षात घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीसाठी दि.३०.६.२०१७ पर्यंतचा दोन दिवसांचा कालावधी अल्प असल्यामुळे "वाचा" येथील क्र.२ च्या शासन शुध्दीपत्रान्वये त्यामध्ये दि.३१.७.२०१७ पर्यंत वाढ करण्यात आली आहे. मा.मुख्यमंत्री महोदयांनी "छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना २०१७" या योजनेच्या निकषात बदल करुन दि.१.४.२००९ रोजी वा त्यानंतर कर्ज घेतलेल्या शेतक-यांना सदर योजना लागू करण्यात येईल अशी घोषणा दि.५.७.२०१७ रोजी केली आहे. त्यानुषंगाने दि.२८.६.२०१७ च्या शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्र :-**

उपरोक्त शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०६१७/प्र.क्र.१२७ /२-स, दि.२८ जून, २०१७ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :-

(१) सदर शासन निर्णयातील "(I) योजनेचा तपशिल" या मथळयाखालील अ.क्र.२ मधील दुस-या ओळीत "दि.१.४.२०१२" या शब्दांऐवजी "दि.१.४.२००९" असा बदल करण्यात यावा.

(२) सदर शासन निर्णयातील "(I) योजनेचा तपशिल" या मथळयाखालील अ.क्र.२ ड) मधील पहिल्या ओळीत "२०१२-१३" या शब्दांऐवजी "२००९-१०" असा बदल करण्यात यावा.

सदर शासन शुध्दीपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७२०१७३६४६१९०२ असा आहे. हे शासन शुध्दीपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.07.20 17:32:40 +05'30'

(दिपक म. राणे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)

३) मा. विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य

४) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा. प्रधान सचिव (ग्रामविकास ), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मा. प्रधान सचिव (कृषि), कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई
९) मा. विभागीय आयुक्त (सर्व)
१०) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे
१३) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१४) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था ,
१५) सर्व जिल्हयाचे मुख्य प्रबंधक तथा जिल्हा अग्रणी बँक अधिकारी
१६) निवड नस्ती.